**गोरेगाव पंचायत समिती (जि.गोंदिया) प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी संरक्षक भिंतीच्या उप कामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन.**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.पंसई २०१०/प्र.क्र.१२८/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : १२ऑगस्ट,२०१०.

संदर्भ : अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प., गोंदिया यांचे पत्र क्र.जिपगो/साबांवि/कार्या-५एफ/२२४४/१०, दिनांक २२.६.२०१०

**प्रस्तावना :-**

गोंदिया पंचायत समितीच्या प्रशासकीय व निवासी इमारतीचे बांधकाम एकाच परिसरात आहे. या परिसरालगत लोकवस्ती असल्याने सदर शासकीय जमिनीवर अतिक्रमण होवू नये, या करीता पंचायत समितीच्या जागेभोवती संरक्षक भिंतीचे बांधकाम करण्याच्या दृष्टीने, अति.मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प., गोंदिया यांनी रु.१५.०० लक्ष अंदाजपत्रकीय किंमतीच्या संरक्षक भिंत बांधकामाचा प्रस्ताव संदर्भीय पत्रान्वये शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावासोबत सविस्तर अंदाजपत्रक, नकाशा, पंचायत समितीच्या ठरावाची प्रत इ. कागदपत्र सादर केलेली आहेत.

त्यानुसार कामाची निकड विचारात घेवून गोंदिया पंचायत समितीच्या प्रशासकीय व निवासी इमारतीच्या जागेच्या ठिकाणी संरक्षक भिंत बांधकाम करण्याच्या रु.१५.०० लक्ष अंदाजपत्रकीय किंमतीचा अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,गोंदिया यांनी संदर्भीय दिनांक २२.६.२०१० च्या पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**-: शासन निर्णय :-**

गोंदिया पंचायत समितीच्या प्रशासकीय व निवासी इमारतीच्या जागेच्या ठिकाणी संरक्षक भिंतीच्या रु. १५,००,०००/- (अक्षरी रुपये पंधरा लक्ष फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या कामी उपलब्धतेनुसार अनुदान स्वरुपात, अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे निधी वितरीत केल्यानंतर बांधकामावरील खर्च लेखाशिर्ष "२५१५ इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायत राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१)(०३) जिल्हा परिषदांच्या इमारत बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने- २५१५००५३" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा.

३. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

४. सदर प्रस्तावाची छाननी मुख्य अभियंता, प्रमंग्रासयो (ग्रामविकास विभाग) यांनी केली आहे.

५. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या http://maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र.**२०१००८२४१४०८५००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

C:\DO_RRD_PARA7\BLDG PROPOSAL\PSE 2010-C.R.128 Goregaon( Gondia)Compoubd Wall .doc

प्रत,

१) विभागीय आयुक्त नागपूर विभाग, नागपूर.
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद गोंदिया
४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद गोंदिया
५) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद गोंदिया
६) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा गोंदिया
७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
८) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा लातूर विभाग, गोंदिया
९) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, गोंदिया
१०) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, गोरेगाव, जिल्हा गोंदिया
११) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२) नियोजन विभाग (का.क्र.१४११/१४७४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३)सार्वजनिक बांधकाम विभाग,इमारती-३, मंत्रालय मुंबई ४०० ०३२
१४)का.क्र, वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई